सन २०२०-२१ चा प्रकल्प अंमलबजावणी आराखडा (PIP)

**राष्ट्रीय आरोग्य अभियानातर्गत अतिदुर्गम व आदिवासी भागात राहून वैद्यकीय सेवा देणाऱ्या नियमित वैद्यकीय अधिकारी विशेष निवासी प्रशिक्षण कार्यशाळा (Continue Medical Education-CME Training) आयोजित करण्यासाठी बाह्य यंत्रणा नियुक्त करण्यासाठी निविदा प्रक्रिया राबविण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-१२२०/प्र.क्र.१६/आरोग्य -७

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : २८ जुलै, २०२०.

**वाचा :-**

१. सहसंचालक (तांत्रिक),राष्ट्रीय आरोग्य अभियान,मुंबई यांचे पत्र क्र.राआअ/ आदी.यो./ CME/१७३८३-३८४/२०२०, दिनांक १६.०३.२०२०.
२. शासन पत्र,समक्रमांक दिनांक ०२.०७.२०२० .
३. सहसंचालक (तांत्रिक),राष्ट्रीय आरोग्य अभियान,मुंबई यांचे पत्र क्र.राआअ/आदी.यो./ CME/२३३८१- ३८२, दिनांक १०.०७.२०२०.

**प्रस्तावना :-**

अतिदुर्गम व आदिवासी भागात राहून काम करणाऱ्या डॉक्टरांना प्रोत्साहन मिळावे, त्यांना शहरी भागातील आरोग्य सुविधांची माहिती व्हावी तसेच डॉक्टरांचे ज्ञान व कौशल्य अद्यायवत व्हावे या उद्देशाने राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत वैद्यकीय अधिकाऱ्यांसाठी विशेष निवासी प्रशिक्षण कार्यशाळा (Continue Medical Education (CME)) प्रशिक्षण आयोजित करण्यात येते. यासाठी बाह्य यंत्रणा नियुक्त करण्यासाठी निविदा प्रक्रिया राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

या अतिदुर्गम व आदिवासी भागात राहून काम करणाऱ्या डॉक्टरांना प्रोत्साहन मिळावे म्हणून विशेष निवासी प्रशिक्षण कार्यशाळा (Continue Medical Education (CME)) प्रशिक्षण आयोजित करण्यासाठी बाह्य यंत्रणा नियुक्त करण्यासाठी निविदा प्रक्रिया राबविण्यास प्रशासकीय

मान्यता देण्यात येत आहे. तथापि, कोविड-१९ संसर्गाचा प्रार्दुभाव संपुष्टात आल्यानंतरच सदरचे प्रशिक्षण सत्र आयोजित केले जातील, या अटीवर प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

०२. या साठी निधीची उपलब्धता पुढीलप्रमाणे आहे.

**PIP 2020-21**

| FMR Code | GOI Remarks | Budget |
|---|---|---|
| 1.1.7.1 | As per NPCC discussion Special Residential CME for Medical Officers in very remote Tribal ares,CME to be organized twice a year for Medical Officers in the Districts of Gadchiroli,Gondia,Melghat (Amrawati),Palghar,Nashik,Dhule and Nandurbar | Rs 64 lakhs |

०३. सदर प्रशासकीय मान्यता ही पुढील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.:-

१. सदर बाबींच्या खरेदीची आवश्यकता /मागणी याची शहनिशा/खातरजमा करण्यात यावी. तदनंतरच सदर बाबींची निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

२. सदरहू बाबींचे विनिदेश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी . सदरहू बाबींचे तांत्रिक विनिदेश ( Technical Specifications) संबंधित तज्ञांनी ( तांत्रिक समिती /अधिकारी )यांनी मान्य केलेल्या विनिदेशानुसारच असावेत. तसेच, सदर तांत्रिक विनिदेश (Technical Specifications) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रीतीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. प्रकल्प अंमलबजावणी आराखड्यात (PIP) मंजूर असलेल्या बाबींच्या तांत्रिक विनिदेशानुसार मागणीपत्र पाठविण्याची जबाबदारी संबंधित कार्यक्रम प्रमुखांची राहील.प्रस्तावात समाविष्ट बाबींवरच निविदा प्रक्रिया करण्यात यावी.

३. शासन निर्णय,उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,क्रमांक भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग -३/उद्योग-४,दिनांक ०१.१२.२०१६ अन्वये प्रसिद्ध करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपद्धतीची सुधारित नियमपुस्तिका यामधील तरतुदीनुसार विहित निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

४. खरेदी प्रक्रीयेअंती दर निश्चित करण्यात यावा.सदर दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबबत आणि संबधित पुरवठादाराने या बाबींचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

५. सदरहू बाबींसाठी होणारा खर्च हा सन २०२०-२१ च्या मंजूर प्रकल्प अंमलबजावणी आराखड्यातील FMR Code १.१.७.१ Special Plans for Tribal मधील रुपये ६४.०० लक्ष ह्या अनुदानातून भागविण्यात यावा.

६. तसेच या बाबींची द्विरुक्ती (Duplication) होणार नाही याची दक्षता घ्यावी.
७. शासन निर्णय,वित्त विभाग,क्र.विअप्र २०१३/प्र.क्र.३०/भाग-२/२०१३/विनिमय,दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उपविभाग-२ मधील अ.क्र.४, नियम क्र.७ समोरील स्तंभ क्र.६ येथील अटींची पूर्तता करण्यात यावी.
८. निविदा प्रक्रिया पूर्ण झाल्यावर खरेदी समितीच्या मान्यतेनंतरच पुरवठा आदेश निर्गमित करण्यात यावेत.
९. शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.खरेदी २०१६/प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७ मधील तरतुदीनुसार कार्यवाही करण्यात यावी.

४. उपरोक्त अनुक्रमांक १ ते ९ येथील अटींची पूर्तता व खरेदी नियमानुसार व आवश्यकतेनुसार आहे हे सुनिश्चित करण्याची जबाबदारी आयुक्त आरोग्यसेवा तथा अभियान संचालक राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई व सम्बन्धित कार्यक्रम प्रमुख यांची राहील.

५. शासन निर्णय,वित्त विभाग,क्र.विअप्र २०१३/प्र.क्र.३०/भाग-२/२०१३/विनिमय, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८,भाग पहिला, उपविभाग-२ मधील अ.क्र.४, नियम क्र.७ अन्वये अवजारे, किरकोळ साधन सामुग्री आणि उपक्रम संच विकत घेण्यास मंजुरी देण्यासाठी प्रशासनिक विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००७२८१६३५५०६०१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Milind Raghunath Kulkarni

Digitally signed by Milind Raghunath Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=438fa70bb728385b5c81bde24450c11d5ce0d99ed18a61fb5b1685722e2c2c03, cn=Milind Raghunath Kulkarni
Date: 2020.07.28 17:31:36 +05'30'

**(मिलिंद कुळकर्णी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत:-

१. आयुक्त,आरोग्य सेवा तथा अभियान संचालक,राष्ट्रीय आरोग्य अभियान संचालक,मुंबई,
२. संचालक,आरोग्यसेवा,मुंबई,
३. संचालक (वित्त व लेखा),राष्ट्रीय आरोग्य अभियान,मुंबई,

४. अतिरिक्त संचालक,राज्य कुटुंब कल्याण कार्यालय,पुणे,
५. सर्व सहसंचालक ( आरोग्य सेवा आयुक्तालयामार्फत )
६. उपसंचालक,सर्व मंडळ कार्यालये,
७. सर्व सर्व जिल्हा शल्य चिकित्सक (FWB मार्फत)
८. जिल्हा आरोग्य अधिकारी (FWB मार्फत)
९. निवड नस्ती (कार्यासन-आरोग्य-७).